**प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत शाळांमध्ये परसबाग उपक्रम राबविण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः शापोआ-२०१८/प्र.क्र.१७१/एस.डी.३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ११ जुलै, २०२३

**वाचा:-**

१) शाळांमध्ये परसबागांबाबत (School Nutrition Gardens) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना दि.१५ ऑक्टोंबर, २०१९.
२) प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेबाबत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना दि.२१ डिसेंबर, २०२२.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत शाळांमध्ये परसबागा निर्माण करुन सदर परसबागांमधून उत्पादित भाजीपाला व इतर पदार्थांचा समावेश शालेय पोषण आहारामध्ये करण्याचे निर्देश दि. १५ ऑक्टोबर, २०१९ रोजीच्या मार्गदर्शक सूचनांनुसार दिले आहेत. त्यानुषंगाने राज्यामध्ये प्रस्तुत उपक्रम सर्व शाळांस्तरावर राबविण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच, परसबाग उपक्रम प्रभावीपणे राबविण्यासाठी विभागामार्फत उत्कृष्ट परसबाग स्पर्धा आयोजित करण्यात येते. विद्यार्थ्यांनी परसबागेत पिकवलेला भाजीपाला, फळे इत्यादींचा शालेय पोषण आहारात समाविष्ट करुन विद्यार्थ्यांना देण्यात येत आहेत. परसबाग निर्मितीमुळे विद्यार्थ्यांची निसर्गाशी जवळीक निर्माण व्हावी, पोषक आहार मिळावा, कुपोषण दूर व्हावे, असे विविध चांगले हेतू या उपक्रमामुळे साध्य होत आहेत. राज्यातील ग्रामीण व शहरी भागातील काही शाळांमध्ये जागा उपलब्ध नसल्यामुळे सदर उपक्रम राबविला जात नसल्याचे दिसून येत आहे. शाळांमध्ये कमी जागेमध्येही विविध पर्यायाद्वारे सदर उपक्रम राबविण्याबाबत केंद्र शासनाने मार्गदर्शक सूचना दिलेल्या आहेत. त्यानुषंगाने राज्यातील शाळांमध्ये परसबागा निर्माण करणे व सदर परसबागांमध्ये लागवड करण्यात येणाऱ्या भाजीपाला याबाबत पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

**शासन परिपत्रक :-**

१) केंद्र शासनाच्या निर्देशाप्रमाणे राज्यातील शाळांमध्ये परसबागा निर्माण करुन सदर परसबागांमधून उत्पादित ताजा भाजीपाला या पदार्थांचा वापर शालेय पोषण आहारामध्ये करण्यात यावा.

२) शाळांमधील उपलब्ध जागा विचारात घेवून परसबागांची निर्मिती करण्यात यावी. सदर परसबागांमध्ये स्थानिक पातळीवर उत्पादित होणाऱ्या भाजीपाला यांची लागवड करण्यात यावी.

३) परसबागेसाठी आवश्यक जागेची मर्यादा विचारात घेता कमी जागेमध्ये व कमी दिवसात तयार होणारा पौष्टीक व अल्पकालीन सूक्ष्म भाजीपाला (मायक्रोग्रीन) हा चांगला पर्याय उपलब्ध आहे. याबाबतची सर्वसाधारण माहिती व फोटो सोबतच्या परिशिष्टात समाविष्ट केलेली आहे.

४) विद्यार्थ्यांचा वयोगट विचारात घवून शाळांमध्ये परसबाग सेंद्रीय पध्दतीने निर्माण करावी. विद्यार्थ्यांना कंपोस्ट, गांडूळ अशी पर्यावरण पूरक खते तयार करण्यास शिकविण्यात यावी.

५) प्रस्तुत उपक्रमाकरीता शाळांनी नजिकचे कृषि विज्ञान केंद्र, कृषि शाळा, कृषि क्षेत्रात काम करणाऱ्या अशासकीय संस्था (NGO), सेंद्रिय शेती करणारे पालक, शेतकरी, कृषि तज्ज्ञ यांचे मार्गदर्शन व सहकार्य घेण्यात यावे.

६) शाळांमध्ये परसबागा निर्माण करण्याकरीता केंद्र शासनाने दि.१५ ऑक्टोंबर, २०१९ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या निर्देशांचे पालन करण्यात यावे.

प्रस्तुत शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०७१११७३३५९४५२१ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

IMTIYAZ MUSHTAQUE KAZI

Digitally signed by IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=39a40419de755c2eab61fb555b2fdf8c8d6d652ff18fdffbd9c748ab01f6da04, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=77A529748C5E7C1BA7A66E81C654BA3C492FDA5B29E076241DB1BA213DDEDF4E, cn=IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
Date: 2023.07.11 17:37:11 +05'30'

**( इ. मु. काझी )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. मंत्री, शालेय शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई

६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य

७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

९) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई

१०) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे

११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे

१३) शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे

१४) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे

१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर

१६) शिक्षणाधिकारी (बृहन्मुंबई), बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई

१७) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)

१८) नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई

१९) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई

२०) निवड नस्ती - एस.डी. ३.

# परिशिष्ट

अल्पकालीन भाजीपाला (मायक्रोग्रीन्स) म्हणजे मोड आलेल्या धान्याच्या पुढची आणि छोट्या रोपांच्याही अलिकडली अवस्था. (रुजलेल्या बियाणाला जी पहिली दोन पाने येतात ती आणि त्यानंतरची जास्तीत जास्त दोन पाने आलेल्या अवस्थेला जो कोंब असतो.)

**भाजीपाला :-** अल्पकालीन भाजीपाल्याची लागवड कोणत्याही हंगामात करता येऊ शकते. यामध्ये अल्पकालीन सूक्ष्म भाजीपाला (मायक्रोग्रीन) मध्ये मेथी, वाल, हरभरा, मूग, बीट, मका, मुळा, मोहरी, सूर्यफूल, कांदा, वाटाणा, चवळी, पालक, राजमा, गहू (गव्हांकूर) इत्यादींची लागवड करता येते.

**सर्वसाधारण लागवड पध्दत :-** अल्पकालीन भाजीपाला लागवड कमी जागेत म्हणजे शाळेच्या टेरेसवर, सुरक्षा भिंतीच्या शेजारी एक ते दोन फूट रुंदीचे वाफे तयार करुन करता येते. तसेच लहान कुंडया, छोटे ट्रे यामध्येही सदर लागवड करुन भाजीपाला उत्पादन घेता येते. सदर अल्पकालीन भाजीपाला सुमारे ३ ते ४ इंच खोलीच्या माती, वाळू, लहान रेती, कोकोपीट इत्यादी मध्ये लावता येतो. लागवड केलेल्या मातीतून पाण्याचा निचरा होणे आवश्यक असते. लागवडीसाठी स्वच्छ पाणी वापरावे.

**अल्पकालीन भाजीपाला काढण्याचा कालावधी व पध्दत :-** पौष्टीक अल्पकालीन पालेभाज्या (मायक्रोग्रीन) कमी कालावधीत म्हणजे ७ ते १० दिवसात तयार होतात. बियाणाची रुजवण झाल्यावर दोन ते तीन दिवसांत अंकुर व मुळे येतात. त्यानंतर बियाणाच्या दलासोबत दोन कोवळी पाने येतात. त्यानंतर काही कालावधीत अजून दोन पाने येतात. साधारण यावेळी हा सूक्ष्म भाजीपाला तयार होतो. सदर भाजीचे कोवळे खोड, बियाणाची दले आणि दोन व चार कोवळी पाने हा जमिनीवरील भाग भाजी करण्यासाठी वापरण्यात येतो. पाणी दिल्याने रोपे काढणे सहज शक्य होते. त्यामुळे भाजी तयार झाल्यावर पाणी देऊन रोपे उपटून काढावी. सदर रोपांची मुळे व्यवस्थित कापावीत. भाजी हलकेच स्वच्छ धुवावी व मुळांचा भाग काढून टाकावा. जमिनीवरील भाजीचा भाग पाण्याने स्वच्छ करुन वापरावा.

दुसरी पध्दत म्हणजे जमिनीवरील भाग कात्रीने कापून घ्यावा व सदर भाग पाण्याने स्वच्छ करुन वापरावा. त्यानंतर काही कालावधीनंतर पाने परत आल्यास पुढच्या वेळी वापरता येतील.

**मायक्रोग्रीन्समधील पोषकतत्वे:-**

- मायक्रोग्रीन्समध्ये पोषक घटक मुबलक प्रमाणात असतात. त्यांच्यातील पोषक घटक अर्क स्वरुपात असतात. पूर्णपणे वाढलेल्या भाज्यांच्या तुलनेत सूक्ष्म जीवनसत्वे, क्षार व अँटि-ऑक्सिडंट्सची पातळी अधिक असते.
- प्रत्येक मायक्रोग्रीनमधील पोषक घटकांमध्ये थोडाफार फरक असला तरी बहुतेक प्रकारांमध्ये पोटॅशिअम, लोह, झिंक, मॅग्नेशिअम आणि तांबे हे घटक मुबलक प्रमाणात असतात.

*********

